सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या कंत्राटी पद्धतीने नेमणूका करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मवैअ-१०५४/प्र.क्र.२४१ (भाग-१)/सेवा-३**

दहावा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,

लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई- ४०० ००१.

दिनांक: ०७ मार्च, २०२४

वाचा :-

१) शासन निर्णय, सा.आ. वि. क्रमांकः मवैअ-१०५४/प्र.क्र.२४१ /सेवा-३, दि. ०२.०३.२०१५

२) शासन निर्णय, सा.आ. वि. क्रमांकः मवैअ-१०५४/प्र.क्र.२४१ /सेवा-३, दि. २१.०४.२०१५

३) शासन निर्णय, सा.आ. वि. क्रमांकः मवैअ-१०५४/प्र.क्र.२४१(भाग-१) /सेवा-३, दि. ०३.१२.२०१८

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या कंत्राटी पध्दतीने नेमणूका करण्याबाबतचे धोरण संदर्भाधिन क्र. १ अन्वये निश्चित केले आहे. तसेच संदर्भाधिन क्र.३ नुसार कंत्राटी नेमणुका करण्याच्या अनुषंगाने तशी समिती गठीत करण्यात आली आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अधिपत्याखालील व जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्या थेट नियंत्रणाखालील असणाऱ्या आरोग्य संस्थांमध्ये वैद्यकीय अधिकारी कंत्राटी पद्धतीने नेमण्याकरीता जिल्हा आरोग्य अधिकारी यांना सदस्य सचिव घोषित करण्याच्या अनुषंगाने सदर समितीत सुधारणा करण्याची बाब शासनच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन क्र. ३ येथील शासन निर्णयामधील समितीमध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अधिपत्याखालील व जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्या थेट नियंत्रणाखालील असणाऱ्या आरोग्य संस्थांमध्ये वैद्यकीय अधिकारी कंत्राटी पद्धतीने नेमण्याकरीता जिल्हा आरोग्य अधिकारी यांना सदस्य सचिव तर जिल्हा शल्यचिकीत्सक यांना सदस्य घोषित करण्यात येत असून उर्वरित सर्व आरोग्य संस्थांमध्ये वैद्यकीय अधिकारी कंत्राटी पद्धतीने नेमण्याकरीता जिल्हा शल्यचिकित्सक यांना सदस्य सचिव तर जिल्हा आरोग्य अधिकारी यांना सदस्य घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०६१२५३४५२६१७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DHONDU DAGALE

Digitally signed by SANJAY DHONDU DAGALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=91c5ac1bc356eb88dac279997c206f0bc13ac253742cc3f97488b07c83657b5f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02E1EAC848EB66AA47BB931E6668D24F8AEF7B3F3FA0341F35962CC85B518C62, cn=SANJAY DHONDU DAGALE
Date: 2024.03.07 11:18:14 +05'30'

**( सं. धों. डगळे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
२) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) विभागीय आयुक्त (महसूल) (सर्व
४) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
५) जिल्हाधिकारी (सर्व)
६) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
७) अधिष्ठाता, वैद्यकीय महाविद्यालये, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग (सर्व)
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
१०) सह संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
११) उप संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
१२) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
१३) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१४) मा. मंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५) अपर मुख्य सचिव (सा.आ.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१६) जिल्हा कोषागार अधिकारी (संबंधित)
१७) आयुक्त, कुटुंब कल्याण यांचे स्वीय सहायक.
१८) निवडनस्ती (सेवा-३)